**गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र. ०६/२००४, (मलबारहिल पो.स्टे. गु.र.क्र. ९३/२००३) मधून उद्भवणा-या सर्वोच्च न्यायालयातील प्रकरणामध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री.राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसपीपी ०९१६/प्र.क्र.२३०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०१७

संदर्भ : १) शासनपत्र विधी व न्याय विभाग क्र. ३७५०/९१/Crim.Gen/१६/A Br.,
दिनांक १२.०९.२०१६

शासन निर्णय :-

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र. ०६/२००४, (मलबारहिल पो.स्टे. गु.र.क्र. ९३/२००३) मधून उद्भवणा-या सर्वोच्च न्यायालयातील (एस.एल.पी. क्र. १३२२२/२०१६ व १३६१८/२०१६) प्रकरणामध्ये तसेच इतर याचीकांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्री.राजा ठाकरे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून विधी व न्याय विभागाने वरील संदर्भाधीन दिनांक १२.०९.२०१६ च्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. याबाबत ॲड. श्री.राजा ठाकरे यांना खालीलप्रमाणे व्यवसायीक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या व्यतीरिक्त त्यांना अन्य कोणतीही फी भत्तेअनुज्ञेय असणार नाहीत.

१) प्रतीदिन परिणामकारक सुनावणी फी रुपये ७५,०००/-

२) मुंबई-दिल्ली-मुंबई विमान प्रवास खर्च.

३) नवीन महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली येथे राहण्याची व्यवस्था.

४) वाहन व्यवस्था.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र - २०१५/प्र.क्र.२१/२०१५/ विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम नियम पुस्तिका - १९७८, भाग-पहिला,

उपविभाग - दोन मध्ये नव्याने समावेश केलेल्या अ.क्र.४९ नियम क्र.१६६-अ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०३१६५२४६६०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2017.03.03 16:53:54 +05'30'

( अ.वि.जोशी )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
२. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड.श्री.राजा बी.ठाकरे, ३०१, मारुती मॅन्शन, १७ रघुनाथ दादाजी स्ट्रीट, फोर्ट, मुंबई- ४००००१.
७. विधी व न्याय विभाग (अे/ब्रँच), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).